**शैक्षणिक वर्ष २०२३-२४ करीता विस्तारीकरणांतर्गत अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयांना नवीन अभ्यास पाठ्यक्रम/विषय, नवीन तुकडी, नवीन विद्याशाखा यांना मान्यता प्रदान करण्यात आलेल्या शासन आदेशात दुरुस्ती करणेबाबत...(शुध्दीपत्रक)**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन शुद्धीपत्रक क्र.** HTED-२९०१०(१०)/३४/२०२४-MHT-(HE-४)
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २८ मे, २०२४.

**संदर्भ:-** १) शासन आदेश, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. मान्यता-२०२३/प्र.क्र. १०५/मशि-४, दि. १५.०६.२०२३.
२) प्र-कुलगुरू, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली यांचे पत्र क्र. जा.क्र./गों.वि/प्र-कुल. का/२०४६/२०२३, दिनांक ११.०८.२०२३.
३) शासनाचे समक्रमांकाचे पत्र, दिनांक ०२.०५.२०२४.
४) प्र-कुलगुरू, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली यांचे पत्र क्र. जा.क्र./गों.वि/प्र-कुल. का/१५२९/२०२४, दिनांक ०६.०५.२०२४.

**शासन शुद्धीपत्रक**:-

संदर्भ क्र. १ येथील शासन आदेशान्वये विद्यापीठाच्या शिफारशीनुसार विस्तारीकरणांतर्गत अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयांना नवीन अभ्यास पाठ्यक्रम/विषय, नवीन तुकडी, नवीन विद्याशाखा यांना मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. तथापि, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली या विद्यापीठाने संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये चिंतामणी एज्युकेशन सोसायटी, बल्लारपूर, जि. चंद्रपूर संचलित चिंमामणी कॉलेज ऑफ सायन्स, पोंभुर्णा, जि. चंद्रपूर या महाविद्यालयास मंजूर करण्यात आलेल्या नवीन अभ्यासपाठयक्रम विज्ञान व तंत्रज्ञान एम.एस्सी. (रसायनशास्त्र, वनस्पतीशास्त्र, प्राणीशास्त्र व सुक्ष्मजीवशास्त्र) आदेशात दुरूस्ती करून “प्राणीशास्त्र” ऐवजी “भौतिकशास्त्र” असा बदल करणेबाबत संबंधित विद्यापीठाने दिनांक ११.०८.२०२३ रोजीच्या पत्रान्वये विनंती केली आहे. त्याअनुषंगाने उपलब्ध कागदपत्रांप्रमाणे विद्यापीठाची शिफारस व कागदपत्रांची तपासणी करण्यात आली. त्यानुसार संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये प्रस्तुत प्रकणी संबंधित विद्यापीठाकडून खुलासा मागविण्यात आला होता. विद्यापीठाचा संदर्भ क्र. ४ येथील पत्रान्वये प्राप्त खुलासा व संबंधित विद्यापीठाने केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने सुधारणा करणे आवश्यक असल्याने खालील विवरणपत्रात नमूद दुरूस्ती करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**शासन आदेश दिनाकं १५.०६.२०२३ मध्ये प्रस्तावित दुरूस्ती**

| अ. क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नाव | विस्तारीकरण | शासन आदेशातील उल्लेख | प्रस्तावित दुरुस्ती |
|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. |
| | **गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली** | | | |
| १. | चिंतामणी एज्युकेशन सोसायटी, बल्लारपूर, जि. चंद्रपूर संचलित चिंतामणी कॉलेज ऑफ सायन्स, पोंभुर्णा, जि. चंद्रपूर | विस्तारीकरण | नवीन अभ्यासपाठयक्रम-विज्ञान व तंत्रज्ञान एम.एस्सी. (रसायनशास्त्र, वनस्पतीशास्त्र, प्राणीशास्त्र व सुक्ष्मजीवशास्त्र) | **नवीन** अभ्यासपाठयक्रम-विज्ञान व तंत्रज्ञान एम.एस्सी. (रसायनशास्त्र, वनस्पतीशास्त्र, **भौतिकशास्त्र** व सुक्ष्मजीवशास्त्र) |

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०५२८११०८३०६६०८ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ASHOK S MANDE
Date: 2024.05.28 11:22:33 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सहसंचालक, उच्च शिक्षण, नागपूर विभाग, नागपूर.
३. कुलसचिव, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली.
४. संबंधित संस्था (विद्यापीठामार्फत)
५. निवडनस्ती (मशि-४)